**उत्कृष्ठ काम करणाऱ्या व नवनवीन संकल्पना राबविणाऱ्या जिल्हाधिकाऱ्यांचा दरवर्षी राज्य स्तरावर उत्कृष्ठ जिल्हाधिकारी म्हणून गौरव सन्मान करण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन,
महसूल व वन विभाग,
शासन निर्णय, क्रमांक : संकीर्ण-०२/२०१०/प्र.क्र. १२/ई-१,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ३ सप्टेंबर, २०१०

**शासन निर्णय** :-

मा. मुख्यमंत्री व मा. मंत्री (महसूल) महोदयांच्या उपस्थितीत विभागीय आयुक्त व जिल्हाधिकारी यांची राज्यस्तरीय परिषद दिनांक ४ व ५ फेब्रुवारी, २०१० रोजी पुणे येथे संपन्न झाली. सदर परिषदेत उत्कृष्ठ काम करणाऱ्या व नवनवीन संकल्पना राबविणाऱ्या जिल्हाधिकाऱ्यांचा दरवर्षी राज्य स्तरावर उत्कृष्ठ जिल्हाधिकारी म्हणून गौरव सन्मान करण्याबाबत निर्णय घेण्यात आला आहे.

२. सदर योजनेचा तपशील पुढीलप्रमाणे आहे :-

**अ) पुरस्काराचे स्वरुप** :-

पुरस्कार प्रशस्तीपत्र व सन्मानचिन्हाच्या स्वरुपात असेल.

**ब) पुरस्काराचे निकष :-**

१) जिल्हाधिका-यांची एका आर्थिक वर्षातील कामगिरी विचारात घेण्यात येईल.

२) निर्विवाद सचोटी व निष्कलंक चारित्र्य

३) विभागीय चौकशी / न्यायालयीन प्रकरण / न्यायालयीन ताशेरे नसावेत

४) जिल्हयासाठी निश्चित करण्यात आलेल्या महसूल वसूलीची उद्दीष्टपूर्ती

५) मंजूर निधीचा योग्य व नियोजनपूर्ण वापर

६) दारिद्रय रेषेखालील व्यक्तींचे जीवनमान उंचविण्यासाठी अंमलात आणलेल्या विशेष उपाययोजना

७) प्रसंगावधान राखून संकट काळात केलेल्या उपाययोजनामुळे टळलेली संभाव्य जीवित व वित्तहानी

८) संगणकीकरणाच्या कामामध्ये विशेष रस

९) नवनवीन संकल्पना अमंलात आणल्यामुळे झालेले सकारात्मक बदल

१०) जिल्हा / उपविभाग / तालुकास्तरावर कार्यालयीन कामकाज पध्दतीत सुचविलेल्या सुधारणेमुळे झालेली वेळेची व वित्तीय बचत

११) शासकीय जमिनीच्या शर्तभंग प्रकरणांचा आढावा घेऊन त्या अनुषंगाने योग्य कार्यवाही करण्यासाठी विशेष परिश्रम

१२) अतिक्रमण निर्मूलन / नियमन याबाबत केलेल्या प्रभावी उपाययोजना

१३) शासकीय पडीक जमीन / गायरान जमिनीबाबत शासनाच्या धोरणाची केलेली परिणामकारक अमलबजावणी

१४) "राजस्व अभियान" अधिकाधिक लोकाभिमुख व परिणामकारक करण्यासाठी केलेल्या उपाययोजना

१५) भूमि अभिलेखांचे संगणकीकरण / अद्यावतीकरण याबाबत केलेल्या उपाययोजना

१६) गौणखनिजाबाबतच्या शासकीय धोरणाची परिणामकारक अमंलबजावणी

१७) अकृषिक परवानगी देण्याबाबत राबविण्यात आलेली लोकाभिमुख कार्यपध्दती

१८) भूसंपादन तसेच प्रकल्पग्रस्तांच्या पुनर्वसनाबाबत राबविण्यात आलेल्या उपाययोजना

१९) आपत्ती व्यवस्थापनाबाबत जिल्हास्तरावर केलेली कार्यवाही

२०) टंचाई निवारण, पैसेवारी, पर्जन्यमान अहवाल व चारा तगाई याबाबत जिल्हास्तरावर राबविण्यात आलेल्या उपाययोजना

२१) शासनाच्या अन्य विभागांच्या योजना जिल्हयात राबविण्यबाबत दिलेले योगदान

२२) जात, अधिवास, राष्ट्रीयत्व दाखले देण्यासाठी गावोगावी तसेच शाळा महाविद्यालयात शिबिरे घेण्यासाठी विशेष परिश्रम.

२३) जिल्हयातील लोकप्रतिनीधींशी सकारात्मक समन्वय साधून जिल्हयातील विकास कामात दिलेले योगदान

२४) जनता व कर्मचारी यांच्याशी असलेल्या संबंधामुळे जनमानसात उंचावलेली जिल्हाप्रशासनाची प्रतिमा

**क) "उत्कृष्ठ जिल्हाधिकारी" या पुरस्कारासाठी निवड करण्याची कार्यपध्दती :-**

१) सर्व विभागीय आयुक्तांनी त्यांच्या अधिनस्त असलेल्या जिल्हाधिका-यांची वरील निकषांवर छाननी करुन एका जिल्हाधिका-याच्या नावाची शिफारस दिनांक ३१ मे पर्यंत शासनास करावी

२) सर्व विभागीय आयुक्तांकडून प्राप्त झालेला शिफारशींची छाननी करुन "उत्कृष्ठ जिल्हाधिकारी" या पुरस्करासाठी एक अथवा अनेक जिल्हाधिका-यांच्या नावाची शिफारस शासनास करण्यात यावी.

**ड) संकीर्ण बाबी**

१) सन २००९-१० या आर्थिक वर्षातील कामगिरीवर प्रथम पुरस्कार देण्यात यावा.

२) या प्रयोजनासाठी होणारा सर्व खर्च हा पुरस्कार समारंभ ज्या विभागीय आयुक्तालयाच्या क्षेत्रात आयोजित करण्यात येईल त्या विभागीय आयुक्तालयाने त्यांना मंजूर केलेल्या कार्यालयीन खर्चातून करावा.

३) सदर योजनेचे २ वर्षानंतर पुनर्विलोकन करण्यात यावे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१००९०८१३५७४३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

*सही/-*

**( राजेंद्र सुर्वे )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई,
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
सर्व अ.मु.स. / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई,
प्रबंधक, मा. उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने),
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व सह सचिव / उप सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व अवर सचिव / कार्यासन अधिकारी, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,
निवडनस्ती (ई-१ कार्यासन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई